**स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांची तपासणी करण्यासाठी नियुक्त समितीचे मानधन व भत्ता यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन पूरकपत्र क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
दिनांक : ७ मार्च, २०२४.

**वाचा :-** शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८/विशि-४, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२४.

**पूरकपत्र** :-

महाराष्ट्र खाजगी विद्यापीठे (स्थापना व विनियमन) अधिनियम २०२३ मधील तरतुदी तसेच शासनाने वेळोवेळी दिलेले आदेश, नियम, तरतुदींचे सर्व स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठे अनुपालन करतात का याबाबतचे निरीक्षण/तपासणी करण्यासाठी दिनांक २७ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली आहे.

२. राज्यातील खाजगी विद्यापीठांची तपासणी करण्यासाठी नियुक्त केलेल्या समितीचे अध्यक्ष व सदस्य यांना प्रति बैठक रु. ६०००/- प्रमाणे मानधन शासनाकडून अदा करण्यात येईल. समितीतील अशासकीय सदस्यांना प्राध्यापक या पदाला अनुज्ञेय असलेल्या दरानुसार प्रवासभत्ता देण्यात येईल. सदर समितीतील शासकीय सदस्यांना वरील प्रमाणे अनुज्ञेय असलेला प्रवासभत्ता संबंधित सदस्य ज्या कार्यालयांमध्ये कार्यरत आहेत त्या कार्यालयांकडून अदा करण्यात येईल.

मानधन व प्रवासभत्ता यावरील खर्च क्रमांक डब्ल्यू-६,२२५१, सचिवालय -सामाजिक सेवा, ०९० - सचिवालय (०१) ,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, (०१) (०१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग (२२५१०४०९), २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षामधून भागविण्यात येईल.

३. प्रस्तुत पूरकपत्र वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २८१/व्यय-५, दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१५०७२९२००८ असा आहे. हे पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT DATTATRAYA KATKAR

Digitally signed by AJIT DATTATRAYA KATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=6ab66d3253a5332c701bb9922697b252de2300d3e9cfe0b93c88e8c299b219a8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DAE81E2CCBD6C60BC3D691080DEA5E5428071B91ADE593F8D918786037CB6A1, cn=AJIT DATTATRAYA KATKAR
Date: 2024.03.07 15:16:31 +05'30'

**(अजित काटकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री,उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
३. प्रो. जी. डी. यादव, माजी कुलगुरु, आयसीटी, मुंबई
४. डॉ. अजित रानडे, कुलगुरु, गोखले राज्यशास्त्र व अर्थशास्त्र अभिमत विद्यापीठ, पुणे

५. प्रो. ए.के. सिंग, डिपार्टमेंट ऑफ एज्युकेशनल पॉलिसी, National Institute of Educational Planning and Administration (NIEPA), नवी दिल्ली.
६. प्रो. अनिरुद्ध पंडीत, कुलगुरू, आयसीटी, मुंबई.
७. श्री. चंद्रशेखर चितळे, सनदी लेखापाल
८. डॉ. रुपेश राऊत, प्राणीशास्त्र विभाग प्रमुख, एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई.
९. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महालेखापाल, (लेखा व परिक्षा-१)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
११. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी(रोखशाखा/अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती.